**शैक्षणिक वर्ष २०२४-२५**
**अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये विस्तारीकरणांतर्गत नवीन अभ्यासक्रम/ विशेषस्तर विषय/ विषय, अतिरिक्त तुकडी/ विद्याशाखा यांना मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:** HTED-२९०६६(१३)/३०/२०२४-MHT-(HE-४)
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०००३२.
दिनांक:- ०९ जुलै, २०२४

**संदर्भ :** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१७/(२०८/१७)/ मशि-४ दिनांक १३.०९.२०१७.

२) दिनांक ५.०७.२०२४ रोजी अधिसूचित करण्यात आलेला महाराष्ट्र अधिनियम क्र. XXIV/२०२४, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ (सुधारणा)अधिनियम, २०२४.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) आणि संदर्भाधीन दिनांक १३.०९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील अकृषि विद्यापीठांनी शैक्षणिक वर्ष २०२४-२०२५ साठी विस्तारीकरणांतर्गत नवीन अभ्यासक्रम / विशेषस्तर विषय / विषय, अतिरिक्त तुकडी / विद्याशाखा यांचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी अग्रेषित केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या निकषांनुसार छाननी करण्यात आली आहे. विद्यापीठांच्या शिफारशींच्या अनुषंगाने शासन स्तरावर केलेली छाननीनुसार पात्र ठरलेल्या प्रस्तावांना महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) (घ) व **त्याखालील परंतुकान्वये** शासनास प्राप्त अधिकारानुसार त्या महाविद्यालयाच्या परिसरातील उच्च शिक्षणाची मागणी व शैक्षणिक निकड लक्षात घेता अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयातील खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार नवीन अभ्यासक्रम / विशेषस्तर विषय / विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सोबत जोडलेल्या विवरणपत्रात ज्या अनुदानित महाविद्यालयांना नवीन अभ्यासक्रम / विषय / विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या

कायम विनाअनुदान तत्त्वावरील असल्याने सदर मान्यतेच्या अनुषंगाने अशा महाविद्यालयांना अनुदान तत्त्वावर शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची मागणी करता येणार नाही.

२. सोबत जोडलेल्या विवरणपत्रात ज्या महाविद्यालयांना नवीन अभ्यासक्रम / विषय / विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयांनी त्यांच्या विभागीय सहसंचालकाकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँम्प पेपरवर सादर करावे.

३. सोबत जोडलेल्या विवरणपत्रात मान्यता मिळालेल्या तुकडी, विद्याशाखा व अभ्यासक्रमांच्या अनुषंगाने महाविद्यालयांनी संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तदनंतर उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र प्रमाणित करून विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयाने/संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय किंवा तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय, संबंधित महाविद्यालयाना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) (घ) खालील पंरतुकानुसार प्राप्त अधिकारात विस्तारीकरणांतर्गत मान्यता देण्यात आलेल्या नवीन अभ्यासक्रम / विषय / विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा यांच्या प्रस्तावातील विद्यापीठाने दर्शविलेल्या नॅक मुल्यांकन या निकषाच्या त्रुटीपुर्ततेची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील. त्याचप्रमाणे सदर त्रुटी पुर्तता ६ महिन्यांच्या आत न झाल्यास सदर मान्यता आपोआप रद्द होईल. याबाबत आवश्यक कार्यवाही करण्याची दक्षता संचालक, उच्च शिक्षण यांनी घ्यावी. सदर कारणास्तव मान्यता रद्द झाल्यास विद्यार्थ्यांच्या समायोजनाची कार्यवाही संचालक, उच्च शिक्षण यांनी करावी.

७. विद्यापीठांनी शासन निर्णयाचे अवलोकन केल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

८. संबधित विद्यापीठाने व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या अभ्यासक्रम / विशेषस्तर विषय / विषय, अतिरिक्त तुकडी / विद्याशाखा यांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर अभ्यासक्रम / विशेषस्तर विषय/ विषय, अतिरिक्त तुकडी / विद्याशाखा यामध्ये मंजुर विद्यार्थी सख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर अभ्यासक्रम /

विशेषस्तर विषय / विषय, अतिरिक्त तुकडी/ विद्याशाखा यांची मान्यता रद्द समजून तसे आदेश विभागीय सहसंचालकांनी काढावेत आणि ते शासन व संबंधित विद्यापीठाकडे पाठवावेत.

२. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मधील तरतूदीनुसार विस्तारीकरणांतर्गत शासन निर्णय निर्गमित करण्याची अंतिम मुदत १५ जून अशी आहे. परंतु शासन अधिसूचना दि. ०५.०७.२०२४ अन्वये सदर मुदत १५ जुलै पर्यंत वाढविण्यात आली आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सकेतांक २०२४०७०९१७३१५५३९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2024.07.09 18:35:41 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुबई.
४) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुबई.
६) आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुबई.
८) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
९) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
११) संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
१२) निवड नस्ती (मशि-४)

## विवरणपत्र

## नवीन अभ्यासक्रम/विषय/ विशेषस्तर विषय/ अतिरिक्त तुकडी/ नवीन विद्याशाखा

| अ.क्र. | क्र. | संस्था/ प्रस्तावित महाविद्यालयांचे नाव व पत्ता | प्रस्तावित नवीन तुकडी |
|---|---|---|---|
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | १. | पिपल्स एज्युकेशन सोसायटीचे अॅड. बाळासाहेब आपटे कॉलेज ऑफ लॉ प्रि. एन.एन.काळे मार्ग, ऑफ गोखले रोड दादर (पश्चिम), मुंबई शहर-४०० ०२८ | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>बॅचलर ऑफ लॉ (एल.एल.बी.) (तीन वर्षीय))<br>(६०-१२०) |
| २. | २. | प्रिती अकॅडमी एज्युकेशन सोसायटी प्रिती अकॅडमी विधी महाविद्यालय, कल्याण मुरबाड रोड, म्हारळ, ता. कल्याण, जि. ठाणे- ४२१ १०३. | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>बॅचलर ऑफ लॉ (एल.एल.बी.) (तीन वर्षीय)<br>(१२०-१८०) |
| ३. | ३. | राष्ट्रीय शिक्षण संस्थेचे स्वामी विवेकानंद विधी महाविद्यालय, छत्रपती भवन, दत्ता नगर, आयरे रोड, डोंबिवली (पूर्व) ता. कल्याण जि. ठाणे. ४२१ २०१. | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>बॅचलर ऑफ लॉ (एल.एल.बी.) (तीन वर्षीय)<br>(६०-१२०) |
| ४. | ४. | अथर्व एज्युकेशन ट्रस्ट अथर्व कॉलेज ऑफ हॉटेल मॅनेजमेंट अँड कॅटरिंग टेक्नॉलॉजी, सर्वे नंबर २६३, प्लॉट नंबर ८-१२, मालाड मार्वे रोड, चारकोप नाका, मालाड (प.), ता. बोरीवली, जि. मुंबई सब-अर्बन- ४०० ०९५. | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>बी.एस्सी. (डाटा सायन्स)-<br>(६०-१२०) |
| ५. | ५. | अॅग्नेल चॅरीटीज अॅग्नेल स्कुल ऑफ लॉ, अॅग्नेल स्कुल ऑफ टेक्निकल एज्युकेशन कॉम्पलेक्स, प्लॉट नं.५४, ६०-६२,६६, सेक्टर-९ ए, वाशी, जि. ठाणे- ४०० ७०५. | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>१) एल.एल.बी. (तीन वर्षीय) (१२०-१८०)<br>२) एल.एल.बी. (पाच वर्षीय) (१२०-१८०) |
| ६. | ६. | चिल्ड्रन वेलफेअर सेंटर्स कॉलेज ऑफ लॉ मार्वे रोड, वलनी गांव, मालाड (प.), ता. बोरीवली, जि. मुंबई- ४०० ०६४. | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>१) बॅचलर ऑफ लॉ (एल.एल.बी.) (तीन वर्षीय)<br>(१८०-२४०)<br>२) मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (६०-१२०) |
| ७. | ७. | जीवन ज्योत एज्युकेशन ट्रस्टचे रीना मेहता कॉलेज ऑफ कॉमर्स अॅड मॅनेजमेंट स्टडिज, सेक्टर नं.५७४/५, फ्लाय ओव्हर ब्रीज,१५० फीट रोड, मॅक्सस मॉल समोर, भायंदर (पश्चिम), जि. ठाणे- ४०१ १०१. | **नवीन अतिरिक्त तुकडी**<br>१) बी.एस्सी.- (इन्फोरमेशन टेक्नोलॉजी)<br>(बी.एस्सी.आय.टी.) (६०-१२०)<br>२) बी.एस्सी. (डाटा सायन्स) (६०-१२०) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/ प्रस्तावित महाविद्यालयांचे नाव व पत्ता | प्रस्तावित नवीन तुकडी |
|---|---|---|---|
| ८. | ८. | श्री राजस्थानी सेवा संघाचे विधी महाविद्यालय, जे.बी. नगर, अंधेरी पूर्व, ता. अंधेरी, जि. मुंबई- सब-अर्बन-४०० ०५९. | **नवीन अतिरिक्त तुकडी** बॅचलर ऑफ लॉ (एल.एल.बी.) (तीन वर्षीय) (६०-१२०) |
| ९. | ९. | वि.प्र.म.चे ठाणे म्युनिसिपल कॉरपोरेशन लॉ कॉलेज चेंदानी बंदर रोड, ता. ठाणे, जि. ठाणे - ४०० ६०१ | **नवीन अतिरिक्त तुकडी** बॅचलर ऑफ लॉ (एल.एल.बी.) (तीन वर्षिय)- पाचवी तुकडी (२४०-३००) |
| १०. | १०. | राजमाता जिजाऊ सायन्स अँड कॉमर्स (नाईट) कॉलेज फॉर बी.एस्सी. (आयटी), प्लॉट नं.६२/६४, सेक्टर ९, दिवा गाव, ऐरोली, जि. ठाणे- ४०० ७०८. | **नवीन विद्याशाखा** बॅचलर ऑफ कॉमर्स (बी. कॉम.)- (०-१२०) |
| ११. | ११. | ऑर्चिड डिग्री कॉलेज ऑफ आर्टस सायन्स अ‍ॅन्ड कॉमर्स सर्वे नं.३३०/१, नायगांव (पूर्व), ता. वसई, जि. पालघर - ४०१ २०८. | **नवीन विद्याशाखा** बी.एस्सी. (इन्फोरमेशन टेक्नोलॉजी)- (०-६०) |
| १२. | १२. | विद्यानिकेतन डिग्री कॉलेज ऑफ आर्टस सायन्स ॲण्ड कॉमर्स बरमपूर, ता. वसई, (प), जि. पालघर - ४०१ २०२. | **नवीन विद्याशाखा** बी.एस्सी. (इन्फोरमेशन टेक्नोलॉजी)- (०-६०) |
| १३. | १३. | पिपल्स एज्युकेशन सोसायटीचे ॲड. बाळासाहेब आपटे कॉलेज ऑफ लॉ प्रि. एन.एन. काळे मार्ग, ऑफ गोखले रोड दादर (पश्चिम), मुंबई शहर-400 028 | **नवीन अभ्यासक्रम** मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (०-६०) |
| १४. | १४. | वनमाला एज्युकेशन ॲण्ड चॅरीटेबल ट्रस्टचे धर्मवीर आनंद दिघे साहेब महाविद्यालय, टी.एम.सी. शाळा क्र.११०, पोखरण रोड नंबर २, गांधीनगर, जि. ठाणे- ४०० ६०६. | नवीन अभ्यासक्रम बी. कॉम. (अकाऊंटिग अँड फायनांस) (०-६०) |
| १५. | १५. | राष्ट्रीय शिक्षण संस्थेचे स्वामी विवेकानंद विधी महाविद्यालय, छत्रपती भवन, दत्ता नगर, आयरे रोड, डोंबिवली (पूर्व) ता. कल्याण जि. ठाणे. ४२१ २०१. | नवीन अभ्यासक्रम विधी - मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (०-६०) |
| १६. | १६. | तटकरे चॅरिटेबल ट्रस्टचे डॉ. श्री नानासाहेब धर्माधिकारी कला, विज्ञान आणि वाणिज्य महाविद्यालय, मु. गोवे, पो. कोलाड, ता. रोहा, जि. रायगड- ४०२ ३०४. | नवीन अभ्यासक्रम बी.एस्सी. (इन्फोरमेशन टेक्नोलॉजी) - (०-६०) |
| १७. | १७. | ॲग्नेल चॅरीटीज ॲग्नेल स्कुल ऑफ लॉ, ॲग्नेल स्कुल ऑफ टेक्निकल एज्युकेशन कॉम्पलेक्स, प्लॉट नं.५४, ६०-६२,६६, सेक्टर-९ ए, वाशी, जि. ठाणे- ४०० ७०५. | नवीन अभ्यासक्रम मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (०-६०) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/ प्रस्तावित महाविद्यालयांचे नाव व पत्ता | प्रस्तावित नवीन तुकडी |
|---|---|---|---|
| १८. | १८. | विश्वेश्वर एज्युकेशन सोसायटी वेस्टर्न वाणिज्य महाविद्यालय, प्लॉट नं. २, सेक्टर-९, सानपाडा, नवीन मुंबई, ता. ठाणे, जि. ठाणे- ४०० ७०५. | नवीन अभ्यासक्रम<br>१)बी.एस्सी. (कॉम्प्युटर सायन्स) (०-६०)<br>२) बी.एस्सी. (डाटा सायन्स)- (०-६०) |
| १९. | १९. | व्हिक्टर डांटस चॅरीटेबल ॲण्ड एज्युकेशनल फाऊंडेशन, कट्टा, व्हिक्टर डांटस लॉ कॉलेज, मु.पो. कुडाळ, ता. कुडाळ, जि. सिंधुदुर्ग- ४१६ ५२०. | नवीन अभ्यासक्रम<br>मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (०-६०) |
| २०. | २०. | सेंट विल्फ्रेडस कॉलेज ऑफ आर्टस, कॉर्मस अ‍ॅन्ड सायन्स, संघवी नगर, बीएमसी गार्डन जवळ, टीव्हीएस मेट्रिक्स मोटरच्या मागे, मीरा भाईंदर रोड, मीरा रोड (पूर्व), जि. ठाणे -४०१ १०७. | नवीन अभ्यासक्रम<br>१) बी.ए. (इन मल्टिमिडीया अँड मास कम्युनिकेशन (बी.ए.एम.एम.सी.) (०-६०)<br>२) बी.एस्सी. (कॉम्प्युटर सायन्स) - (०-६०)<br>३) बी.एस्सी. (इन्फोरमेशन टेक्नोलॉजी)- (०-६०)<br>४) बी.एस्सी. (डाटा सायन्स)- (०-६०) |
| २१. | २१. | श्री राजस्थानी सेवा संघाचे विधी महाविद्यालय, जे.बी. नगर, अंधेरी पूर्व, ता. अंधेरी, जि. मुंबई- सब-अर्बन-४०० ०५९. | नवीन अभ्यासक्रम<br>मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (०-६०) |
| २२. | २२. | विद्यावर्धीनी मंडळाचे आय. सी. ई. कॉलेज ऑफ हॉटेल मॅनेजमेंट, दारावे गाव रोड, नेरुळ पोलिस स्टेशनच्या माग, सेक्टर-२३, नेरुळ (पूर्व), नवी मुंबई, जि. ठाणे- ४०० ७०६. | नवीन अभ्यासक्रम<br>बी.एस्सी. (हॉस्पिटॅलिटी स्टडीज) (०-६०) |
| २३. | २३. | वि.प्र.म.चे ठाणे म्युनिसिपल कॉरपोरेशन लॉ कॉलेज चेंदानी बंदर रोड, ता. ठाणे, जि. ठाणे - ४०० ६०१ | नवीन अभ्यासक्रम<br>मास्टर ऑफ लॉ (एल.एल.एम.) (०-६०) |
| | **डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर** | | |
| २४. | २४. | श्री. हरि बहुउद्देशीय सामाजिक व शिक्षण संस्थेचे श्री. छत्रपती वरिष्ठ महाविद्यालय, गारज, ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजीनगर | नवीन अभ्यासक्रम<br>बी.एस्सी. (Forensic Science)<br>एम.एस्सी. (कॉम्प्युटर सायन्स) |

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2024.07.09 18:35:58 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**